201102081447722001

संवर्ग मुख्याधिकाऱ्यांना श्रेणीवाढ करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : एमसीओ-१२९५/३३०८/प्र.क्र.१३८/९५/नवि-१४
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १० मे, २००४

**प्रस्तावना:**

राज्यातील नगरपरिषदांमधील मुख्याधिकाऱ्यांचा संवर्ग सन १९७४ पासून तयार करण्यात आला. राज्यातील नागरीकरणाचा वाढीव वेग, पर्यायाने निर्माण होणाऱ्या नागरी समस्या लक्षात घेता संवर्ग मुख्याधिका-यांना नागरी संस्थांमध्ये नियुक्तीची मागणी सर्व स्तरावरुन होते. संवर्ग मुख्याधिका-यांना नागरी प्रशासनाचे इत्यंभूत माहिती असते. ७४ व्या घटना दुरुस्तीनंतर संवर्ग मुख्याधिकाऱ्यांच्या कर्तव्ये व जबाबदाऱ्यांमध्ये झालेली वाढ लक्षात घेऊन नागरी प्रशासन अधिक कार्यक्षम, सतर्क व्हावे, नागरिकांना अधिक चांगल्या नागरी सुविधा मिळाव्यात, तसेच संवर्ग मुख्याधिकाऱ्यांच्या सेवेतील कुंठितता घालविण्याच्या दृष्टीने संवर्ग मुख्याधिकाऱ्यांना श्रेणीवाढ देण्याची व महानगरपालिकेत नियुक्ती देणेबाबत धोरण निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

अ) संवर्ग मुख्याधिकारी श्रेणी-३ (गट-क) रु.५५००-१७५-९००० या वेतनश्रेणीतील सर्व पदे रद्द करण्यात येत आहेत. या वेतनश्रेणीतील सर्व (४०) पदांचा दर्जा वाढवून ही पदे आता राजपत्रित श्रेणी-२ (गट-ब) मध्ये रुपांतरित करुन श्रेणीवाढ देण्यात येत आहे. दर्जा वाढीमुळे या पदाची सुधारित वेतनश्रेणी रु.६५००-२००-१०५०० अशी राहिल.

ब) संवर्ग मुख्याधिकारी श्रेणी-२ (गट-ब) वेतनश्रेणी रु.६५००-२००-१०५०० च्या २१२ पदांपैकी १३६ पदांचा दर्जा वाढवून आता ही पदे श्रेणी-१ (गट-अ) मध्ये रुपांतरित करुन श्रेणीवाढ देण्यात येत आहे. दर्जा वाढीमुळे या पदाची वेतनश्रेणी रु.८०००-२७५-१३५०० अशी राहिल. ही पदे सध्या अस्तित्वात असलेल्या श्रेणी-१ (गट-अ) च्या १८ पदाव्यतिरिक्त असतील. महानगरपालिकेतील जागा यासुध्दा या पदाव्यतिरिक्त असतील.

क) संवर्ग मुख्याधिकारी श्रेणी-१ (गट-अ) च्या सेवाजेष्ठ मुख्याधिकाऱ्यांना राज्यातील महानगरपालिकामध्ये नियुक्ती देण्यात येईल. त्याचा संपूर्ण खर्चाचा बोजा महानगरपालिकेवर राहील. त्यामुळे पदसंख्येत वाढ होईल.

(कृ. मा. प. .......

ड) निवडश्रेणी गटातील संवर्ग मुख्याधिकाऱ्यांची जी पदे महानगरपालिकामध्ये पाठविण्यात येतील त्या पदावरील संपूर्ण खर्च संबंधीत महानगरपालिकेकडून केला जात असल्यामुळे तेवढीच संवर्ग मुख्याधिकाऱ्यांच्या पद संख्येमध्ये वाढ होईल.

पूर्वपृष्ठावर नमूद सुधारित वेतनश्रेणी दिनांक १/१/१९९६ पासून लागू करण्यात येत असून संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांनी त्यानुसार वेतननिश्चिती करावयाची आहे. सुधारित वेतनश्रेणीनुसार वेतननिश्चिती करुन देय वेतन दिनांक १/३/२००४ पासून देय राहील. संवर्ग मुख्याधिकाऱ्यांना श्रेणीवाढ केल्यामुळे सुधारित पदसंख्या व त्यांची वेतनश्रेणी खालीलप्रमाणे राहील :-

| संवर्ग | पदे | वेतनश्रेणी |
|---|---|---|
| मुख्याधिकारी (गट-ब) | ११६ | रु.६५००-२००-१०५०० |
| मुख्याधिकारी (गट-अ) | १५४ | रु.८०००-२७५-१३५०० |
| निवडश्रेणी मुख्याधिकारी (गट-अ च्या २०%) | ३१ | रु.१०६५०-३२५-१५८०० |

महानगरपालिकेतील जागा या पदाव्यतिरिक्त असतील. लोकसंख्येतील वाढीमुळे राज्यातील नागरी संस्थांच्या संरचनेमध्ये जे संभाव्य बदल होतील. त्यानुसार वर्ग अ, ब, क, नगरपरिषदांच्या व महानगरपालिकांच्या संख्येनुरुप मुख्याधिकाऱ्यांच्या पदसंख्येत बदल होतील.

संवर्ग मुख्याधिकारी (गट-अ) श्रेणीच्या सेवेतील कुंठितता घालविण्यासाठी सर्व महानगरपालिकेत मंजूर असलेल्या "उपायुक्त" व समकक्ष पदाच्या ५०% पदावर नियुक्तीची तसेच निवडश्रेणी मुख्याधिकाऱ्यांना नवनिर्मित महानगरपालिकेत "आयुक्त" व सध्या अस्तित्वात असलेल्या महानगरपालिकेमध्ये ५ लक्ष वा त्यावरील लोकसंख्या असलेल्या महानगरपालिकेत मंजूर "अतिरिक्त आयुक्त" पदावर तसेच ज्या महानगरपालिकेत पद नसेल तेथे अतिरिक्त आयुक्त पद निर्माण करण्याचे निर्देश महानगरपालिकांना देऊन अतिरिक्त आयुक्त पदावर नियुक्त्या देण्यात येईल.

संवर्ग मुख्याधिकाऱ्यांच्या श्रेणीवाढीमुळे (गट-ब) तसेच (गट-अ) मध्ये समाविष्ट झालेल्या मुख्याधिकाऱ्यांची सुधारित सेवाजेष्ठता यादी प्रसिध्द करण्याचा प्रस्ताव संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांनी हे आदेश निर्गमित झाल्यापासून एक महिन्यात शासनास सादर करावा.

सदरहू शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.२३५/२००४/सेवा-९, दिनांक २७/४/२००४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

(र. ग. पवार)
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई ४०० ०२५
आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
विभागीय आयुक्त, सर्व महसूल विभाग
जिल्हाधिकारी (सर्व)
मुख्याधिकारी, नगरपालिका (सर्व)
नगराध्यक्ष, नगरपालिका (सर्व)
महालेखाकार, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व जिल्हे
संचालक, नगररचना, पुणे
मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई
उपमुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, सर्व महसूली विभाग
प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
सह सचिव/ उप सचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी
(सर्व कार्यासने) नगर विकास विभागातील सर्व अधिकारी
निवडनस्ती (नवि-१४)
विषय नस्ती (नवि-१४).